यवतमाळ जिल्ह्यातील अनुदानित वसतिगृहांच्या
मान्य विद्यार्थी संख्या वाढीस मंजूरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१३/प्र.क्र.४३५/शिक्षण -२
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : १४ ऑगस्ट, २०१४.

वाचा -

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतीक कार्य व क्रीडा विभाग, क्र.बीसीएच-१०९७/प्र.क्र.१०५/मावक-४, दि. १६ मार्च, १९९८
२) शासन निर्णय क्रमांक:- बीसीएच-२००८/प्र.क्र.६६९/मावक-४,दि.३ डिसेंबर,२००८
३) शासन शुध्दिपत्रक क्रमांक:- बीसीएच-२०१२/प्र.क्र.१२५/मावक-४, दि.३ डिसेंबर,२०१२
४) संचालक/आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र क्र.सकसं/शिक्षण/अनुवगृह / मासंवा/प्रक्र.५६१/ का-५/ २०१०-११/ ६२०, दि.२० नोव्हेंबर, २०१०
५) जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे पत्र क्र: स.क.वि./ य.जि.प. /अनुवगृ., दि.३० जून, २०१४
६) जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे पत्र क्र: स.क.वि./ य. जि. प./ गृह/७३०/१४-१५,दि.२.०८.२०१४.
७) जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे पत्र क्र: स.क.वि./ य. जि. प./ आस्था /७६१/१३-१४,दि.५.०८.२०१४.

प्रस्तावना -

संदर्भाधिन अनु क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील मागासवर्गीय अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान ही योजना राबविण्यात येते. या शासन निर्णयातील जोडपत्र-अ मधील नियम क्रमांक ८ (ग) नुसार मान्यता प्राप्त अनुदानित मागासवर्गीय वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या मंजूर संख्येत वाढ करण्याची तरतूद आहे.त्यास अनुसरुन यवतमाळ जिल्ह्यातील स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या मागासवर्गीय अनुदानित मुला-मुलींच्या वसतिगृहांची मान्य विद्यार्थी संख्या वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय-

उपरोक्त प्रस्तावांचा सखोल विचार करुन तसेच यवतमाळ जिल्ह्यातील शिल्लक विद्यार्थी संख्या विचारात घेऊन यवतमाळ जिल्ह्यातील खालीलप्रमाणे अनुदानित मुला-मुलींच्या वसतिगृहांना विद्यार्थी संख्या वाढवून देण्यास शासन मान्यता देत आहे :-

| अ.क्र. | संस्थेचे व वसतिगृहाचे नाव | सध्या मंजूर विद्यार्थी संख्या | मान्य विद्यार्थी संख्येत वाढ करण्यास मान्यता दिलेली संख्या | वाढीनंतर एकूण विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|---|
| १. | अहिल्याबाई होळकर स्मारक संस्था, पुसद, जि.यवतमाळ संचलित अहिल्याबाई होळकर मागासवर्गीय मुलांचे वसतीगृह, टेंभी, ता.महागाव, जि.यवतमाळ | २४ | १० | ३४ |
| २. | युवक मंडळ, पुसद संचलित वसंतराव नाईक मागासवर्गीय मुलांचे वसतीगृह, पुसद, जि.यवतमाळ | ३६ | १२ | ४८ |
| ३. | शाहू महाराज बहुद्देशीय मागासवर्गीय शिक्षण संस्था, येळाबारा, ता.जि. यवतमाळ संचलित इंदिरा मागासवर्गीय मुलींचे वसतीगृह, उमरसरा, ता. यवतमाळ, जि.यवतमाळ | ३५ | ८ | ४३ |
| ४. | बहुद्देशीय विकास संस्था, हर्षी, ता.पुसद, जि.यवतमाळ संचलित शेवंताबाई मोघे मागासवर्गीय मुलींचे वसतिगृह, हर्षी, ता.पुसद, जि.यवतमाळ | २४ | ५ | २९ |

२. या योजनेकरीता सध्या अस्तित्वात असलेल्या शासन निर्णय दि. १६ मार्च, १९९८ मधील तरतूदीप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी अनुदान निर्धारण करण्याबाबत योग्य ती कार्यवाही करावी. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यवतमाळ यांनी प्रतिवर्षी त्यांना नियमानुसार मंजूर करण्यात येणाऱ्या आर्थिक तरतूदीमधून हा खर्च भागविणे आवश्यक राहील.

३. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१४१३१४००२०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2014.08.21 11:10:41 +05'30'

**डॉ.वसंत माने**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
२. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, अमरावती
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
६. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
८. सचिव/अध्यक्ष, अहिल्याबाई होळकर स्मारक संस्था, पुसद, जि.यवतमाळ
९. सचिव/अध्यक्ष, युवक मंडळ, पुसद, जि. यवतमाळ .
१०.सचिव/अध्यक्ष, शाहू महाराज बहुद्देशीय मागासवर्गीय शिक्षण संस्था, येळाबारा, ता.जि. यवतमाळ
११.सचिव/अध्यक्ष, बहुद्देशीय विकास संस्था, हर्षी, ता.पुसद, जि.यवतमाळ
१२.निवड नस्ती.